सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी समग्र शिक्षा अभियान (सर्व शिक्षा अभियान) कार्यक्रमासाठी पहिल्या हप्त्याचा अनावर्ती (Capital) निधी (आदिवासी उपयोजना हिस्सा) वितरीत करणेबाबत (केंद्र व राज्य हिस्सा).

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०१८/प्र.क्र.१५० भाग-३/एस.डी-१**

मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २५ जानेवारी, २०१९

**वाचा -**

१) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक पीआरई-२०००/(२७४०)/प्राशि-१, दि. १८/०१/२००२
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८
३) केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली आदेश क्रमांक : एफ नं.७-१/२०१८-IS-१२ (ST), दिनांक २९/१०/२०१८
४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र.मप्राशिप /लेखा-२/केंद्र-राज्य निधी मागणी/२०१८-१९/३०९०, दि.०१/१२/२०१८
५) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.बीयुडी-२०१८/प्र.क्र.०४/कार्यासन-६, दि.११/०१/२०१९

**प्रस्तावना-**

समग्र शिक्षा अभियान (सर्व शिक्षा अभियान) योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने दिनांक २९/१०/२०१८ च्या आदेशान्वये केंद्र शासनाचा पहिल्या हप्त्याचा अनावर्ती (Capital) (Non Recurring) आदिवासी उप योजनेचा निधी (TSP) रु.३,६९,३७,०००/- (रुपये तीन कोटी एकोणसत्तर लाख सदतीस हजार फक्त) इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला आहे. समग्र शिक्षा अभियान योजनेसाठी केंद्र शासनाने वाचा क्र.३ येथील पत्रान्वये राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला निधी व सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्याचा निधी मंजूर करण्याचा प्रस्ताव राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी वाचा क्र.४ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.५२८/अर्थोपाय, दि.१२/१२/२०१८ अन्वये अभिप्राय दिले आहेत. सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्सा रु.२,४६,२४,६६७/- (रुपये दोन कोटी शेहेचाळीस लाख चोवीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतका येतो. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास आदिवासी विकास विभागाने वाचा क्र.५ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला केंद्र हिस्स्याचा पहिल्या हप्त्याचा अनावर्ती (Capital) (Non Recurring) आदिवासी उप योजनेचा निधी (TSP) रु.३,६९,३७,०००/- (रुपये तीन कोटी एकोणसत्तर लाख सदतीस हजार फक्त) व त्याप्रमाणात राज्य हिस्सा (आदिवासी उप योजनेचा निधी) रु.२,४६,२४,६६७/- (रुपये दोन कोटी शेहेचाळीस लाख चोवीस हजार सहाशे

सदुसष्ट फक्त) असा एकूण रु.६,१५,६१,६६७/- (रुपये सहा कोटी पंधरा लाख एकसष्ट हजार सहाशे सदुसष्ट फक्त) निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**<u>शासन निर्णय-</u>**

समग्र शिक्षा अभियान (सर्व शिक्षा अभियान) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरिता मागणी क्र.टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१, प्राथमिक शिक्षण, ७९६ जनजाति क्षेत्र उपयोजनाए (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०६) सर्व शिक्षा अभियान योजना (६० टक्के केंद्र हिस्सा) लेखाशिर्ष (२२०२ आय ४४१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता एकूण रु.११२.५० कोटी तरतूद अर्थसंकल्पित आहे. तर त्यास समवर्ती राज्य हिस्सा म्हणून (०१) (०७) सर्व शिक्षा अभियान योजना (४० टक्के राज्य हिस्सा) लेखाशिर्ष (२२०२ आय ४५२) ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता एकूण रु.७५ कोटी तरतूद अर्थसंकल्पित आहे.

२. केंद्र शासनाने समग्र शिक्षा अभियान (सर्व शिक्षा अभियान) योजनेकरिता उपलब्ध करुन दिलेला केंद्र हिस्स्याचा पहिल्या हप्त्याचा अनावर्ती (Capital) (Non Recurring) आदिवासी उप योजनेचा निधी (TSP) रु.३,६९,३७,०००/- (रुपये तीन कोटी एकोणसत्तर लाख सदतीस हजार फक्त) व त्याप्रमाणात राज्य हिस्सा (आदिवासी उप योजनेचा निधी) रु.२,४६,२४,६६७/- (रुपये दोन कोटी शेहेचाळीस लाख चोवीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त) असा एकूण रु.६,१५,६१,६६७/- (रुपये सहा कोटी पंधरा लाख एकसष्ट हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे समग्र शिक्षा अभियान कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

वरीलप्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या रु.३,६९,३७,०००/- (रुपये तीन कोटी एकोणसत्तर लाख सदतीस हजार फक्त) इतक्या निधीचा खर्च "मागणी क्र.टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१, प्राथमिक शिक्षण, ७९६ जनजाति क्षेत्र उपयोजनाए (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०६) सर्व शिक्षा अभियान योजना (६० टक्के केंद्र हिस्सा) (२२०२ आय ४४१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) व रु.२,४६,२४,६६७/- (रुपये दोन कोटी शेहेचाळीस लाख चोवीस हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतक्या निधीचा खर्च (०१) (०७) सर्व शिक्षा अभियान योजना (४० टक्के राज्य हिस्सा) लेखाशिर्ष (२२०२ आय ४५२) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या दि.०२/०४/२०१८ रोजीच्या परिपत्रकात नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरित केलेला निधी केंद्र शासनाचे दि.२९/१०/२०१८ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०१८-१९ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा अंतर्गत कार्यक्रमांच्या भांडवली मत्ता निर्माण करणाऱ्या अनावर्ती बाबीसाठी खर्च करावा. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तीक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

५. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ.माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

६. आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०२/०४/२०१८ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०२/०४/२०१८ च्या शासन परिपत्रकान्वये, वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.५२८/अर्थोपाय, दि.१२/१२/२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व आदिवासी विकास विभागाच्या दिनांक ११/०१/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२५१६५६५९१५२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Umeshrao Gaikwad

Digitally signed by Santosh Umeshrao Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, serialNumber=bc8833f9e213a7e4dfb9d2b071c9202ea52a04054e53b0c1bbf9e50c90a2cf5c, cn=Santosh Umeshrao Gaikwad
Date: 2019.01.25 17:05:28 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग/आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर

८) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३

९) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)

१०) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई

११) वित्त विभाग, (व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई

१२) अवर सचिव / कक्ष अधिकारी,रोख शाखा/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) निवड नस्ती (एस.डी.१)